राज्यातील बँकिंग परवाना नसलेल्या नागपूर, वर्धा व बुलडाणा जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना त्यांचा CRAR किमान ७% होण्यासाठी शासकीय भागभांडवल स्वरुपात अर्थसहाय्य उपलब्ध करण्यास मंजूरी देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. बैठक-०३१५/प्र.क्र.१२२/२-स,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक : २७ ऑक्टोबर,२०१५.**

**वाचा :-** १) शासन निर्णय क्र. बैठक-०६१३/प्र.क्र.३७५/२-स, दिनांक १९/६/२०१४.
२) शासन शुध्दिपत्रक क्र. बैठक-०६१३/प्र.क्र.३७५/२-स, दिनांक ३/९/२०१४.
३) शासन निर्णय क्र. बैठक-०६१३/प्र.क्र.३७५/२-स, दिनांक २७/३/२०१५.
४) शासन निर्णय क्र. बैठक-०६१३/प्र.क्र.३७५/२-स, दिनांक ३१/३/२०१५.

**प्रस्तावना :-**

राज्यातील नागपूर, वर्धा व बुलडाणा जि.म.स. बँक मर्यादित या तीन बँकांना भारतीय रिझर्व्ह बँकेकडून अद्याप बँकिंग परवाना प्राप्त झालेला नाही. या बँकांनी बँकिंग परवाना प्राप्त होण्यासाठी दि. ३१/३/२०१२ पूर्वी निकषांची पूर्तता करणे आवश्यक होते. परंतु या बँका सदर निकषांची पूर्तता करु शकल्या नाहीत. या बँकांना निकषांची पूर्तता करण्यासाठी भारतीय रिझर्व्ह बँकेने दि. ३०/९/२०१२ पर्यंत मुदतवाढ दिली होती. तथापी या बँका भांडवल पर्याप्ततेची (CRAR) अट पूर्ण करु शकल्या नाहीत. या बँकांना दि. ३१/३/२०१४ च्या आर्थिक स्थितीनुसार ४% CRAR ची पूर्तता करण्यासाठी आवश्यक असलेले रु. ३१९.५४ कोटी शासकीय भागभांडवलाच्या स्वरुपात अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्यास दि. १९/६/२०१४ च्या शासन निर्णयाद्वारे तत्वत: मंजूरी देण्यात आली होती.

केंद्र शासनाने दि. १७/११/२०१४ च्या पत्राद्वारे देशातील बँकिंग परवाना नसलेल्या २३ जि.म.स. बँकांचे पुनरुज्जीवन करण्याबाबतच्या योजनेस मान्यता दिली आहे. त्यामध्ये राज्यातील नागपूर, वर्धा व बुलडाणा या जि.म.स. बँकांचा समावेश आहे. या योजनेनुसार या तीन बँकांना अर्थसहाय्य करण्याबाबत संदर्भ क्र. ३ व ४ मधील शासन निर्णय निर्गमित करण्यात आले आहेत. त्यानुसार या तीन बँकांना मंजूर केलेल्या रु. ४४५.६५ कोटी अर्थसहाय्यापैकी रु. ३७९.६७ कोटी अर्थसहाय्य वितरित करण्यात आले आहे. तथापी या तीन बँकांची नाबार्डमार्फत दि. ३१/३/२०१५ च्या आर्थिक स्थितीवर तपासणी करण्यात आली असून या संदर्भात नाबार्डकडून दि. ३०/७/२०१५ व दि. १२/८/२०१५ च्या पत्राद्वारे शासनास प्राप्त झालेल्या अहवालानुसार या बँकांना दि. ३०/९/२०१५ च्या संभाव्य आर्थिक स्थितीवर रु. १४५०९.०७ लाख अर्थसहाय्याची आवश्यकता आहे.

नाबार्डच्या अहवालानुसार या बँकांना आवश्यक असलेल्या अतिरिक्त रु. १४५०९.०७ लाख अर्थसहाय्यापैकी संदर्भ क्र. ३ मधील शासन निर्णयानुसार मंजूर केलेल्या रु. ४४५.६५ कोटी अर्थसहाय्यापैकी अद्याप वितरित न केलेली रक्कम रु. ६५९८.०० लाख विचारात घेता रु. ७९११.०७ लाख अतिरिक्त अर्थसहाय्य मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नागपूर, वर्धा व बुलडाणा या जि.म.स. बँकांना यापूर्वी दिलेले शासकीय अर्थसहाय्य रु. ३७९.६७ कोटी व नाबार्डच्या अहवालानुसार या बँकांची दि. ३०/९/२०१५ अखेरची संभाव्य आर्थिक स्थिती विचारात घेऊन ७% CRAR ची पूर्तता करण्यासाठी आवश्यक असलेले अर्थसहाय्य रु. १४५०९.०७ लाख भागभांडवल स्वरुपात मंजूर करण्यात येत आहे. या अर्थसहाय्यापैकी संदर्भ क्र. ३ मधील शासन निर्णयानुसार मंजूर केलेल्या रु. ४४५.६५ कोटी रकमेपैकी अद्याप वितरित न केलेली व सन २०१५-१६ या आर्थिक वर्षासाठी नियतव्यय उपलब्ध असलेली रक्कम रु. ६५९८.०० लाख विचारात घेता रु. ७९११.०७ लाख अतिरिक्त अर्थसहाय्य वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

केंद्र शासनाच्या योजनेनुसार मंजूर केलेल्या रु. ३७९.६७ कोटी अर्थसहाय्यापेक्षा अतिरिक्त अर्थसहाय्याची रक्कम रु. १४५०९.०७ लाख भागभांडवल स्वरुपात मंजूर करण्यात येत आहे. महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० चे कलम ५० मधील तरतूदीनुसार राज्य शासन सहकारी संस्थांमध्ये त्यांच्या वसुल भागभांडवलाच्या कमाल २५% मर्यादेपर्यंत शासकीय भागभांडवल देऊ शकते. या बँकांना त्यांच्या २५% मर्यादेपर्यंत संदर्भ क्र. ३ मधील शासन निर्णयानुसार भागभांडवल मंजूर करण्यात आले असून त्यापेक्षा अधिक आवश्यक असलेली अर्थसहाय्याची रक्कम रु. १४५०९.०७ लाख भागभांडवल स्वरुपात मंजूर करण्यासाठी सहकार कायद्याच्या कलम १५७ अन्वये शासनास असलेल्या अधिकाराचा वापर करुन कलम ५० मधील तरतूदीमधून या बँकांना सूट देण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार दि. २७/३/२०१५ च्या शासन निर्णयातील अद्याप वितरित न केलेली रक्कम रु. ६५९८.०० लाख व या शासन निर्णयानुसार मंजूर केलेली अतिरिक्त रक्कम रु. ७९११.०७ लाख अशी एकूण रक्कम रु. १४५०९.०७ लाख या तीन बँकांना खालील तपशीलानुसार भागभांडवल स्वरुपात मंजूर करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **बँकेचे नांव** | **अर्थसहाय्याची रक्कम (रु. लाख)** |
|---|---|---|
| १. | नागपूर जि.म.स. बँक | २४८१.०० |
| २. | वर्धा जि.म.स. बँक | ५०३७.३३ |
| ३. | बुलडाणा जि.म.स. बँक | ६९९०.७४ |
| **एकूण** | | **१४५०९.०७** |

दि. २७/३/२०१५ च्या शासन निर्णयानुसार रु. ४४५.६५ कोटी अर्थसहाय्यापैकी या तीन बँकांना वसुल भागभांडवलाच्या २५**%** होणारी रक्कम अनुक्रमे रु. १५.८० कोटी, रु. ७.१९ कोटी व रु. १२.५१ कोटी अशी एकूण रु. ३५.५० कोटी भागभांडवल स्वरुपात व त्यापेक्षा अधिक होणारी रक्कम अनुक्रमे रु. १४५.२३ कोटी, रु. ११८.७७ कोटी व रु. १४६.१५ कोटी अशी एकूण रु. ४१०.१५ कोटी अनुदान स्वरुपात उपलब्ध करण्यास शासनाची मान्यता देण्यात आली आहे. तथापी त्यामध्ये अंशत: बदल करुन केंद्र शासनाच्या योजनेतंर्गत रु. ३७९.६७ कोटी अर्थसहाय्यापैकी भागभांडवल स्वरुपात मंजूर केलेल्या रक्कम रु. ३५.५० कोटी व्यतिरिक्त उर्वरित रक्कम अनुक्रमे रु. ११५.९४ कोटी, रु. १०३.६५ कोटी व रु. १२४.५८ कोटी अशी एकूण रु. ३४४.१७ कोटी अनुदान स्वरुपात मंजूर करण्यात येत आहे.

वरीलप्रमाणे या बँकांना वितरित केलेले रु. ३७९.६७ कोटी अर्थसहाय्य विचारात घेऊन नाबार्डच्या दि. ३०/७/२०१५ व दि. १२/८/२०१५ च्या अहवालानुसार या बँकांना दि. ३०/९/२०१५ च्या आर्थिक स्थितीवर आवश्यक असलेल्या अतिरिक्त अर्थसहाय्याची रक्कम रु. १४५०९.०७ लाख सहकार कायद्यातील कलम ५० मधील तरतूदीस कलम १५७ मधील तरतूदीनुसार सूट देऊन भागभांडवल स्वरुपात मंजूर

करण्यात येत आहे. अर्थसहाय्याची ही रक्कम संबंधित बँकेकडून पुढील दहा वर्षात वार्षिक समान हप्त्यात वसुल करण्यात यावी.

वरील अर्थसहाय्याची रक्कम बँकांनी “भाग भांडवल ठेव खाते” (Share Capital Deposit A/c) या स्वतंत्र खात्यामध्ये ठेवण्यात यावी.

संदर्भ क्र. १ ते ४ मधील शासन निर्णयातील अटी व शर्ती सदर अर्थसहाय्यासाठी लागू राहतील. तसेच शासनास आवश्यकता वाटल्यास अन्य अटी व शर्तीबाबत स्वतंत्र आदेश निर्गमित करण्यात येईल.

सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात वितरित करावयाच्या रु. १४५०९.०७ लाख रकमेपैकी सन २०१५ च्या पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध केलेल्या तरतूदीमधून रक्कम रु. ६५९८.०० लाख एवढा खर्च भागविण्यात यावा. उर्वरित रक्कम रु. ७९११.०७ लाख विहित मार्गाने अर्थसंकल्पित केल्यानंतर उपलब्ध करुन देण्यात येईल. याप्रमाणे उपलब्ध होणारी रक्कम खालील लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावी :-

मागणी क्र. व्ही-३,
मुख्य लेखाशिर्ष-४४२५-सहकारावरील भांडवली खर्च,
(००) (१०७) - पत सहकारी संस्थांमधील गुंतवणूक,
(०४) (०२) जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना भागभांडवल
(राज्य योजना) (दत्तमत) (४४२५०७६८),
३२ - अंशदान

वरील रक्कम रु. १४५०९.०७ लाख अर्थसहाय्य वितरित करण्यासाठी अप्पर आयुक्त व विशेष निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियत्रंण अधिकारी म्हणून तसेच लेखाधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाकडील अनौपचारिक संदर्भ क्र. अनौसं ३९०/१५/व्यय-२, दि. २८/९/२०१५ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५१०२७१५५७३९०५०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Arun Patil

Digitally signed by Santosh Arun Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Officer On Special Duty, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=e52439642ab57c332b2a3e3e46f0d907ba6167409ef6d52c943bf775ecf042fd, cn=Santosh Arun Patil
Date: 2015.10.27 17:35:21 +05'30'

**( संतोष पाटील )**
विशेष कार्य अधिकारी

**प्रत :-**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.

२. मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव. (सर्व)
३. मा. विधानसभा सदस्य / मा. विधान परिषद सदस्य. (सर्व)
४. मा. अप्पर मुख्य सचिव (वित्त).
५. मा. प्रधान सचिव (नियोजन).
६. प्रधान महालेखाकार (लेखापरीक्षा-१/२), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. प्रधान महालेखाकार Voucher Level Computer Section (VLC), मुंबई.
८. रिजनल डायरेक्टर, भारतीय रिझर्व्ह बँक, प्रादेशिक कार्यालय, नागपूर.
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१०. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. विभागीय आयुक्त, नागपूर व अमरावती.
१२. मुख्य महाप्रबंधक, नाबार्ड, प्रादेशिक कार्यालय, पुणे
१३. जिल्हाधिकारी, नागपूर, वर्धा व बुलडाणा.
१४. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (प्रशासन / ले.प.), नागपूर व अमरावती.
१५. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या., मुंबई.
१६. मुख्य कार्यकारी अधिकारी, नागपूर, वर्धा व बुलडाणा जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्या.
१७. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, नागपूर, वर्धा व बुलडाणा.
१८. जिल्हा विशेष लेखापरीक्षण वर्ग-१, सहकारी संस्था, नागपूर, वर्धा व बुलडाणा.
१९. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
२०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, नागपूर, वर्धा व बुलडाणा.
२१. कार्यासन अधिकारी (रोखशाखा) / सह सचिव (वित्त), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. वित्त विभाग (व्यय-२ व अर्थ-१३), मंत्रालय, मुंबई.
२३. नियोजन विभाग (का-१४३१), मंत्रालय, मुंबई.
२४. कक्ष अधिकारी (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५. निवड नस्ती (२-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.